**स्मार्ट सिटी अभियान**
**मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांच्या प्रशासकिय व्यवस्थेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्मार्टसि.-२०१८/प्र.क्र.३९७/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०१८

**वाचा-**

शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांकः स्मार्टसि-२०१६/अनौस-५८/प्र.क्र.२६१ /नवि-२३,

दिनांक १८ जून, २०१६.

**शासन निर्णय -**

संदर्भाधिन शासन निर्णया नुसार राज्यातील स्मार्ट सिटीज साठी विशेष उद्देश वहनाची (एस.पी.व्ही) स्थापना महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ६६ (अ) व ६६ (४१-अ) च्या तरतुदीनुसार करण्यात आली आहे. सदर विशेष उद्देश वहनाच्या संरचना व कार्यपद्धतीबाबत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या तरतुदीनुसार वेळोवळी निर्देश देण्याचे अधिकार राज्य शासनाकडे आहेत.

**०२.** स्मार्ट सिटी अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रत्येक स्मार्ट सिटी विशेष उद्देश वहनासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी नियुक्त करण्याची तरतुद आहे. त्यानुसार स्मार्ट सिटी अभियानातील प्रकल्पांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी ज्या विशेष उद्देश वहनाचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे आयुक्तांपेक्षा स्वतंत्रपणे नियुक्त झालेले आहेत त्यांच्या अधिकार कक्षा, रजा मंजुरी व अन्य प्रशासकिय कार्यवाही करण्याबाबत शासनाने खलील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

अ) स्मार्ट सिटी अभियानाच्या अंमलबजावणीसाठी नियुक्त करण्यात आलेल्या विशेष उद्देश वहनाचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे संबंधित स्मार्ट सिटी महानगरपालिकेच्या आयुक्तांच्या पर्यवेक्षणाखाली काम करतील.

ब) मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या प्रशासकिय बाबीबाबतची कार्यवाही (रजा मंजुरी, दौरे याबाबतची कार्यवाही) संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांच्या मान्यतेने करण्यात यावी.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८११०३१५३५२०३८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Pandurang
Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra,
ou=Urban Development Department,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54e
fe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65,
cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.11.03 15:38:56 +05'30'

**( पां.जो.जाधव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव , मंत्रालय , मुंबई .
३. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव
५. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव (उर्वरीत सर्व), मंत्रालय मुंबई
६. मा. राज्यमंत्री नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. राज्यमंत्री सर्व विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, नगर विकास विभाग - १
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
११. अध्यक्ष विशेष उद्देश वहन पुणे/सोलापूर/नाशिक/ठाणे/नागपूर/ कल्याण-डोंबिवली/औरंगाबाद/पिंपरी-चिंचवड
१२. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) - १, मुंबई
१३. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) - २, नागपुर
१४. सर्व विभागीय आयुक्त
१५. सर्व संबंधित जिल्हाधिकारी
१६. उप सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. आयुक्त,ठाणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/कल्याण-डोंबिवली/पुणे/सोलापूर महानगरपालिका
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी विशेष उद्देश वहन पुणे/सोलापूर/नाशिक/ठाणे/ कल्याण-डोंबिवली/औरंगाबाद/पिंपरी-चिंचवड
१९. निवड नस्ती, नवि-३३.